**उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त झालेल्या अधिकाऱ्यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. इएसटी-२०१५/४९७/प्र.क्र.११३/उद्योग-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ७ ऑक्टोबर, २०१५.

<u>संदर्भ</u> : १) शासन अधिसूचना, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, क्र : आयएसटी-२१७०/ ६०२/उद्योग-३, दिनांक १०.०७.१९८४
२) शासन निर्णय क्रमांक, आयएसटी-२०११/२०३५/प्र.क्र.२७८/उद्योग-३, दिनांक ३१.१२.२०१२
३) उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. उसं/आस्थापना/नियुक्ती/ उ.अ.परिविक्षाधीन समाप्ती/२०१५/अे-१८२४, दि. ३०.०७.२०१५ व दि.७.९.२०१५

**<u>प्रस्तावना :</u>**

उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये २१ उमेदवारांची संदर्भ क्र.१ च्या शासन अधिसूचनेतील ४ (अ) (एक) विहित केल्यानुसार २ वर्षांच्या परिविक्षा कालावधीसाठी उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब या पदावर नियुक्ती करण्यात आली आहे. त्यातील २१ उमेदवारांपैकी १९ उमेदवारांनी नियुक्ती स्विकारली आहे. संदर्भाधीन क्र.१ च्या अधिसूचनेनुसार या पदासाठी विहित केलेले परिविक्षाधीन कालावधी पूर्ण करण्यासाठी विभागीय परीक्षा नियम तयार करण्यात आले आहेत. त्यानुसार पहिल्याच संधीत १९ पैकी ४ उमेदवारांनी विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली आहे.

ज्या अधिकाऱ्यांनी विभागीय परीक्षा उत्तीर्ण केली आहे त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणारा परिपूर्ण प्रस्ताव उद्योग संचालनालय, मुंबई यांचेकडून संदर्भ क्र. ३ येथील पत्र व सहपत्रान्वये प्राप्त झालेला आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्तावातील ४ परिविक्षाधीन उद्योग अधिकारी (तां) यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उद्योग संचालनालयाच्या आस्थापनेवर उद्योग अधिकारी (तांत्रिक), गट-ब या पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या एकूण २१ उमेदवारांपैकी १९ उमेदवारांनी नियुक्ती स्विकारली असल्याने सदर उमेदवारांना संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये २ वर्षांच्या परिविक्षा कालावधीवर, नियुक्ती देण्यात आली आहे. सदर १९ अधिकारी कर्तव्यावर रुजू झाले असून यापैकी ४ उमेदवारांनी संदर्भ क्र. १ च्या अधिसूचनेनुसार विहित केलेली विभागीय परिक्षा पहिल्यांच संधीमध्ये उत्तीर्ण केली आहे. या ४ अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालासह

परिपूर्ण माहिती उद्योग संचालनालयाकडून संदर्भ क्र. ३ अन्वये प्राप्त झाली आहे. संदर्भ क्र. २ च्या नियुक्ती आदेशातील अटीनुसार २ वर्षांचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या खालील अधिकाऱ्यांचा परिविक्षा कालावधी त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून समाप्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सदर दिनांकापासून खाली नमूद अधिकाऱ्यांची उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब या पदावरील नियुक्ती नियमित करण्यात येत आहे -

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | रुजु झाल्याचा दिनांक | रजा कालावधी (असल्यास) | परिविक्षा कालावधी समाप्त दिनांक | स्थानापन्न नियुक्तीचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | श्री.संतोष सदाशिव गवळी | ०१.०२.२०१३ | २७ दिवस | २७.०२.२०१५ | २८.०२.२०१५ |
| २ | श्री.अजित पोपट शिंदे | ०१.०२.२०१३ | ७३ दिवस | १४.०४.२०१५ | १५.०४.२०१५ |
| ३ | श्री.उमेशचंद्र सुरेश दंडगव्हाळ | १०.०१.२०१३ | ६ दिवस | १५.०१.२०१५ | १६.०१.२०१५ |
| ४ | श्री.अमोल शिवलिंग बळे | ०२.०२.२०१३ | ६ दिवस | ०७.०२.२०१५ | ०८.०२.२०१५ |

२. विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांनी सर्व संबंधितांना कळवून उपरोक्त अधिकाऱ्यांच्या सेवापुस्तकात योग्य ती नोंद घेण्याची कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००७१३१४५८१७१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaijnath Bhujangrao Latake

Digitally signed by Vaijnath Bhujangrao Latake
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8502d8fbaa5d3d31358e5bf349fc0853019893b61049b2ad260bccf75c596136, cn=Vaijnath Bhujangrao Latake
Date: 2015.10.07 13:16:35 +05'30'

( वै.भू.लटके )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
सर्व संबंधित अधिकारी

**प्रत :**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राद्वारे)
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर

३. संचालक, लेखा व कोषागारे

४. उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय

५. महाव्यवस्थापक/व्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र

६. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी

७. उप सचिव (१२) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. उप सचिव (८) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. निवडनस्ती (उद्योग -३).